राष्ट्रीय कृषि विकास योजना अंतर्गत दर्जेदार टसर अंडीपुंज उत्पादनातून रेशीम उद्योगाचा विकासास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृयो-१०१४/प्र. क्र. ६०/रेशीम कक्ष**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

तारीख: ६ सप्टेंबर, २०१४

**वाचा :-**

१) **कृषि व पदूम विभाग क्र. राकृवियो-०५१४/प्र.क्र. २६/राकृवियोकक्ष, दि. १८ जुलै, २०१४ चे इतीवृत्त.**

२) **संचालक, रेशीम, नागपूर यांचे पत्र क्र. रेशीम/कार्या-८/राकृवियो/प्रस्ताव/१४/९५७ दि. २५ एप्रिल, २०१४.**

**प्रस्तावना :-**

टसर रेशीम शेतक-यांना टसर अंडीपुंजाचा नियमित व पुरेश्या प्रमाणात अंडीपुंजाचा पुरवठा होणे आवश्यक आहे. तथापि राज्यातील शासकिय व खाजगी ग्रेणेजची क्षमता विचारात घेता आजमितीला मागणीच्या तुलनेत अंडीपुंजाचा पुरवठा करण्यास अडचण निर्माण होत आहे. याचे प्रमुख कारण बिज कोषाचा तुटवडा व बिज कोषाचे दर आहे. शेतक-यांना टसर अंडीपुंजाचा नियमीत व पुरेसा पुरवठा व्हावा म्हणून नव्या १० मड हाऊसचे बांधकाम हाती घेण्यात आले असून ही मड हाऊसेस पूर्णत्वाच्या मार्गावर आहेत. त्याशिवाय इतर राज्यातील टसर बीज कोषाचे दर विचारात घेवून राज्यातील बीज कोषाचे दरही वाढविण्यात आले आहेत. त्यामुळे आतापर्यंत टसर अंडीपुंजाकरीता बाहेरील स्रोतावर अवलंबून राहावे लागत होते ती अडचण आता दूर होण्यास मदत होईल. ही बाब विचारात घेता योजनेतर खर्चातून निधी मिळण्यास मर्यादा येत असल्यामुळे संचालक (रेशीम) यांनी संदर्भीय पत्र क्र. २ अन्वये सन २०१४-१५ ते २०१६-१७ या तीन वर्षांच्या कालावधीकरीता राष्ट्रीय कृषि विकास कार्यक्रमातंर्गत टसर बीज कोष खरेदी करणे व अनुषंगीक बाबीकरीता आवश्यक निधी मंजुर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. या बिज कोष खरेदीमुळे राज्यातंर्गत असलेल्या अंडीपुंज निर्मिती क्षमतेचा पुरेपूर वापर होवून अंडीपुंज पुरवठा नियमित व पुरेश्या प्रमाणात करता येणे शक्य होणार आहे. याचा परिणाम राज्यात टसर रेशीम उद्योग वाढीसाठी होणार आहे. या प्रकल्पामध्ये बिज कोषाची खरेदी व वाहतूक, टसर ग्रेणेजचे आधुनिकिरण, मजूरी इ. खर्चाचा समावेश असून याकरीता रु. ३२६.५५ लाख इतका निधी राष्ट्रीय कृषि विकास कार्यक्रमातंर्गत उपलब्ध करुन देण्याची विनंती संचालक (रेशीम) यांनी त्यांच्या प्रस्तावाद्वारे केली होती. त्यानुसार संचालक (रेशीम) यांचा प्रस्ताव कृषि व पदुम विभागास मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. त्यास अनुसरुन सदर प्रस्तावास व त्या अनुषंगाने येणा-या रु. ३२६.५५ लाख खर्चास उच्चस्तरीय प्रकल्प समन्वय समितीच्या दि. ५ जुलै, २०१४ च्या बैठकीत मंजूरी देण्यात आली आहे.

या मंजुरीच्या अनुषंगाने दर्जेदार टसर अंडीपुंज उत्पादन करून रेशीम उद्योगाचा विकास व अनुषंगीक बाबीकरीता रु. ३२६.५५ लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्यातील टसर रेशीम शेतक-यांना नियमित, दर्जेदार व आवश्यक त्या प्रमाणात अंडीपुंजाचा पुरवठा होणेकरीता दर्जेदार बीज कोष व अनुषंगीक बाबी खरेदी करण्याची योजना राष्ट्रीय कृषि विकास कार्यक्रमातंर्गत रावविण्यास शासन मंजूरी देत आहे. सदर योजनेचा कालावधी सन २०१४-१५ ते २०१६-१७ असा राहील. या बीज कोष व अनुषंगीक बाबीवर वर नमूद कालावधीकरीता रु. ३२६.५५ लाख इतका निधी खर्च करण्यास पुढील अटी व शर्तीत अनुसरुन मान्यता देण्यात येत आहे.

१) राज्यातील टसर ग्रेणेजची क्षमता विचारात घेवून बीज कोष खरेदी करीता मांनकाप्रमाणे व निश्चीत केलल्या दराप्रमाणे खरेदी करण्यात यावे.

२) टसर बीज कोष हे राज्यातील टसर उद्योजकांकडून खरेदी करण्यात येतील याची दक्षता सर्व पातळीवर घेण्यात यावी.

३) बीज कोष खरेदी करुन केंद्रीय रेशीम मंडळाच्या मानंकाप्रमाणे दर्जेदार अंडीपुंजाची निर्मिती करण्यात यावी.

४) टसर अंडीपुंज ग्रेणेजच्या आधुनिकीकरणासाठी आवश्यक असणारी साधन सामुग्री केंद्रीय रेशीम मंडळ यांनी निश्चित केलेल्या सामुग्रीनुसार असावी.

५) साहित्य खरेदी करताना विहित शासकिय कार्यप्रणालीचा उपयोग करण्यात यावा.

६) बाराव्या पंचवार्षिक योजनेत टसर ग्रेणेजच्या आधुनिकिरणाकरीता साधन सामुग्रीची बाब समाविष्ठ आहे. त्यामुळे या बाबीवर दोन्हीही योजनेतून खर्चाची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता संचालक (रेशीम) यांना घ्यावी.

७) सन २०१४-१५ ते २०१६-१७ या तीन वर्षाकरीता सदर कार्यक्रम राबवायचा असल्यामुळे दरवर्षी मंजूर व वितरीत केलेल्या निधीतून खर्च भागविण्यात यावा.

८) ज्या कामकाजासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच बाबीवर खर्च करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

९) नवीन साहित्य खरेदी केल्यानंतर जुने व नादुरुस्त साहित्याचे निर्लेखन विहित कार्यपध्दतीने करण्यात यावे.

१०) या कामकाजाकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विनियोग विहित कालावधीत होईल याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी तसेच निधीचे विनियोग प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे.

सदर शासन निर्णय कृषि विभाग यांचे दिनांक १८ जुलै, २०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१००८/प्र. क्र.७०/२००८, विनिमय दिनांक १५ मे, २००९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच दोन मधील अनुक्रमांक ४५ नियम क्र. १६९ अन्वये करण्यात आलेल्या सुधारणानुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१६१०४५६५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2014.09.06 16:05:28 +05'30'

( वि. रा. ठाकूर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ऑडीट), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/ऑडीट), नागपूर
३. वरिष्ठ उप महालेखापाल (पडताळणी), बाह्य लेखापरिक्षा विभाग (नागरी), मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (कृषि) मंत्रालय, मुंबई-३२
७. उपसचिव (कृषी) तथा सदस्य सचिव, राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष, कृषी व पदूम, मंत्रालय, मुंबई
८. संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर.
९. सहाय्यक संचालक, प्रादेशीक रेशीम कार्यालय, नागपूर
१०. सर्व टसर जिल्हा रेशीम कार्यालय (गडचिरोली, चंद्रपूर, अर्जनी मोरगांव जि. गोंदिया व पाथरी जि. चंद्रपूर)
११. निवड नस्ती.

********